**रु. ३,००,०००/- पेक्षा जास्त रकमेच्या वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती मंजूर करण्याचे प्रशासकीय विभागास असलेले अधिकार महसूल विभागाचे विभागीय आयुक्त व जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : वैखप्र-२०१५/प्र.क्र.२५/ई-११,**
मंत्रालय, पहिला माळा, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ३२.
दिनांक : ३० नोव्हेंबर, २०१६.

**संदर्भ :-** सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.:वैखप्र-२०१६/प्र.क्र.१६/ २०१६/ राकावि-२, दिनांक १६.०३.२०१६.

**प्रस्तावना :-**

शासकीय कर्मचारी व त्यांच्या कुटुंबियांना महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम, १९६१ मधील तरतुदींच्या अधीन राहून, आकस्मिक उद्भवणाऱ्या २७ आजारांवर खाजगी रुग्णालयात घेतलेल्या उपचारांवरील तसेच ५ गंभीर आजारांवर शासनाने संपूर्ण खर्चाच्या प्रतिपूर्तीसाठी मान्यता दिलेल्या खाजगी रुग्णालयात घेतलेल्या उपचारांवरील वैद्यकीय खर्चाच्या प्रत्येक प्रकरणी रु. ३,००,०००/- पेक्षा जास्त रकमेच्या वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीस मंजुरी देण्याचे अधिकार संदर्भीय शासन निर्णयान्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभाग प्रमुखांना प्रदान करण्यात आले आहेत. वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीच्या प्रक्रियेत गतीमानता येण्यासाठी यासंदर्भात महसूल विभागांतर्गत असलेल्या क्षेत्रिय कार्यालयांसाठी मंत्रालयीन प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव (महसूल) यांना असलेल्या वरील अधिकारांचे प्रत्यायोजन सर्व महसूल विभागाचे विभागीय आयुक्त, जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासकीय कर्मचारी व त्यांच्या कुटुंबियांना महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम, १९६१ मधील तरतुदींच्या अधीन राहून, आकस्मिक उद्भवणाऱ्या २७ आजारांवर खाजगी रुग्णालयात घेतलेल्या उपचारांवरील तसेच ५ गंभीर आजारांवर शासनाने संपूर्ण खर्चाच्या प्रतिपूर्तीसाठी मान्यता दिलेल्या खाजगी रुग्णालयात घेतलेल्या उपचारांवरील वैद्यकीय खर्चाच्या प्रत्येक प्रकरणी रु. ३,००,०००/- पेक्षा जास्त रकमेच्या प्रतिपूर्तीस मंजुरी देण्याचे मंत्रालयीन प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव (महसूल) यांना महसूल विभागांतर्गत असलेल्या क्षेत्रिय कार्यालयातील अधिकारी व कर्मचारी यांच्यासंदर्भात असलेले अधिकार, याबाबतीत सर्व प्रचलित शासन निर्णयांचे काटेकोर पालन करण्याच्या अटीवर सर्व महसूल विभागाचे विभागीय आयुक्त, जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्रत्यायोजित करण्यात येत आहेत.

२. वरील अधिकारांच्या प्रत्यायोजनानंतरही संबंधित महसूल विभागीय आयुक्त, जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमी अभिलेख, पुणे यांनी घेतलेल्या निर्णयांबाबत प्रधान सचिव (महसूल) यांना **"मंत्रालयीन प्रशासकीय विभाग प्रमुख"** म्हणून पुनर्विलोकन करुन फेर आदेश किंवा सुधारित आदेश देऊ शकतील. तसेच, याप्रमाणे अधिकारांच्या प्रत्यायोजनानंतरही प्रधान सचिव (महसूल) यांचे याबाबतच्या प्रकरणी निर्णय घेण्याचे अधिकार अबाधित राहतील.

३. सदर शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग यांचे अनौ.संदर्भ क्र. २९३/राकावि-२, दिनांक ०४.११.२०१६ व वित्त विभाग यांचे अनौ.संदर्भ क्र. १३६/सेवा-५, दिनांक १८.११.२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६११३०१६३५२३८६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशांनुसार व नांवाने,

Sambhaji C Mondkar

Digitally signed by Sambhaji C Mondkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=498986dde0d282daba86b0acfc9c21d4f9594cc3a6d64857d6a53c9b86d5509b, cn=Sambhaji C Mondkar
Date: 2016.12.02 16:53:51 +05'30'

**( सं. चं. मोंडकर )**
शासनाचे सह सचिव.

**प्रति :**

१. मा. राज्यपाल महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (महसूल) व राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
८. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
९. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.सर्व विभागीय आयुक्त.
१२.जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमी अभिलेख,महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३.सर्व जिल्हाधिकारी.
१४.उप सचिव, महसूल व वन विभाग/कार्या. ई-६, मंत्रालय, मुंबई.
१५.सर्व उप संचालक, भुमी अभिलेख.
१६.सर्व जिल्हा अधिक्षक, भुमी अभिलेख.
१७.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१८. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१९.सर्व कोषागार अधिकारी.
२०.निवड नस्ती, महसूल व वन विभाग/ई-११.